**उप विभागीय अभियंता ( स्थापत्य ) अंतिम ज्येष्ठतासूची मध्ये सुधारणा करण्याबाबत- दि.१.४.१९९५ ते दि.३१.१२.२०००**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांक ज्येष्ठता २०१२/प्र.क्र.२९/आस्था-१**
मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: - ४ जुलै,२०१५

वाचा -

१. शासन परिपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग,क्र.ज्येष्ठता-२०१२/प्र.क्र.२९/आस्था-१, दि.२७.१.२०१४.

**शुध्दीपत्रक** :-

विभागांतर्गत उप विभागीय अभियंता ( स्थापत्य ) संवर्गाची दि. १.४.१९९५ ते दि. ३१.१२.२००० या कालावधीची अंतिम ज्येष्ठतासूची शासन परिपत्रक,सार्वजनिक बांधकाम विभाग,क्र.ज्येष्ठता-२०१२/प्र.क्र.२९/आस्था-१,दि.२७.१.२०१४ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेली आहे.

२. सदरहू अंतिम ज्येष्ठतासूचीमध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत.

अ) अनु क्र. २८ येथील रकाना क्र. ३ येथे श्री. व्ही.व्ही.कारंडे ऐवजी श्री. व्ही.बी. कारंडे असे वाचावे.

ब) अनु क्र. ७४ येथे दर्शविण्यात आलेले श्री.डी.एच.चौधरी यांच्या नावासमोर रकाना क्र.६ येथील नियुक्ती दि. १३.११.१९९५ ऐवजी दि. ११.८.१९९५ असे वाचावे.

क) अनु क्र. २५२ येथे श्री. पी.व्ही. नाईक यांच्या नावासमोरील रकाना क्र. ४ येथील भ.ज.(क) या जात प्रवर्गाऐवजी भ.ज.(ड) हा जात प्रवर्ग असे वाचावे.

ड) अनु क्र. २४८ येथील श्री. यु.एस.शेकडे यांची सुधारीत ज्येष्ठता अ.क्र. २५२ ( अ ) येथे दर्शविण्यात येत आहे.

इ) अनु क्र. २४९ येथील श्री.एस.पी.दराडे यांची सुधारीत ज्येष्ठता अनु क्र. २५२ (ब) येथे दर्शविण्यात येत आहे.

ई) अनु क्र. १२३ येथील श्री. ए.ए.सावेकर व अनु क्र. २०० येथील श्री. एस.एस.समद यांच्या नावांसमोरील रकाना क्र. २ येथे दर्शविण्यात आलेले (# ) हे सांकेतिक चिन्ह वगळण्यात येत आहे.

उ) दि. १.४.१९८५ ते दि. ३१.३.१९९५ या कालावधीच्या दि. २८.७.२००९ रोजी प्रसिध्द करण्यात आलेल्या अंतिम ज्येष्ठतासूचीमधील अनु क्र. २५३ येथील श्री. पी.जे.कोहाडे ( अ.ज. ) यांची ज्येष्ठता सदरहू ज्येष्ठतासूची मधून वगळण्यात येऊन त्यांची सुधारीत ज्येष्ठता दि. १.४.१९९५ ते दि. ३१.१२.२००० या कालावधीच्या दि. २७.१.२०१४ रोजी प्रसिध्द करण्यात आलेल्या अंतिम ज्येष्ठतासूचीमध्ये अ.क्र. ३ ( अ) येथे वि.मा.प्र. प्रवर्गामधून दि. १५.६.१९९५ या दिनांकास दर्शविण्यात येत आहे.

३. दि.२१.७.२०१४ रोजी प्रसिध्द करण्यात आलेल्या अंतिम ज्येष्ठतासूचीमध्ये वरीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

४. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१५०७०४१६०११०२९१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sulbha Narendra Pore

Digitally signed by Sulbha Narendra Pore
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sulbha Narendra Pore
Date: 2015.07.04 16:03:53 +05'30'

**( सुलभा पोरे )**
कार्यासन अधिकारी

**प्रती,**

सर्व उपविभागीय अभियंता (स्थापत्य) व्दारा-संबंधित मुख्य अभियंता,(स्थापत्य) त्यांना विनंती आहे की, शासनाच्या संकेतस्थळावरुन सदर शासन शुध्दीपत्र घेऊन त्याच्या प्रती विभागांतर्गत कार्यरत असलेल्या उपविभागीय अभियंता (स्थापत्य) यांना पाठवून त्यांची पोच प्राप्त करावी.

**प्रत,**

१. सर्व मुख्य अभियंते (स्थापत्य), सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,महाराष्ट्र राज्य.
२. सर्व अधिक्षक अभियंते (स्थापत्य),सार्वजनिक बांधकाम मंडळ, महाराष्ट्र राज्य.
३. सर्व उप विभागीय अभियंता (स्थापत्य), द्वारा संबंधीत मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,महाराष्ट्र राज्य.
४. संगणक कक्ष/आस्थापना-३/सेवा-१/सेवा-२ कार्यासने,सा.बां.वि. मंत्रालय, मुंबई,
५. आस्थापना-१ कार्यासन (निवड नस्ती).